**कोषागारातून रोख देय अनुदान**

केंद्र पुरस्कृत स्वच्छ भारत मिशन (ग्रा.) अंतर्गत सन २०१८-१९ या आर्थिक वर्षासाठी केंद्र हिश्श्याचे जनजाती क्षेत्र उपयोजना घटकासाठी (अनुसुचित जमाती घटक) अनुदान वितरीत करण्याबाबत...

**(लेखाशीर्ष २२१५ ९८६२)**

**महाराष्ट्र शासन**

**पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग**

शासन निर्णय क्रमांकः स्वभामि-२०१८/प्र.क्र.४८५/पापु-१६

७ वा मजला, जी.टी. रूग्णालय संकुल,

लोकमान्य टिळक मार्ग, मंत्रालय, मुंबई- ४०० ००१.

दिनांक: २७ सप्टेंबर, २०१८

वाचा

१. **केंद्र शासनाचे मंजूरी आदेश क्र.: एस-१२०११/७/२०१५-एसबीएम,दि.२५/०७/२०१८.**
२. **वित्त विभागाचे शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०१८/प्र.क्र.६९/अर्थ-३, दि.०२ एप्रिल,२०१८**
३. **आदिवासी विकास विभागाचे शासन निर्णय क्रमांक: बीयुडी-२०१८/प्र.क्र.०६/ कार्यासन.६, दि.२९ ऑगस्ट, २०१८.**

प्रस्तावना

केंद्र पुरस्कृत स्वच्छ भारत मिशन (ग्रा.) योजनेअंतर्गत केंद्र हिश्याच्या जनजाती क्षेत्र उपयोजना घटकासाठी (अनुसुचित जमाती घटक) २२१५ ९८६२ या लेखाशीर्षाखाली सन २०१८-१९ या वर्षाकरीता रु.४७२२५.७१ लक्ष नियतव्यय मंजुर करण्यात आला असून तो पुर्णपणे अर्थसंकल्पीत करण्यात आला आहे. उक्त वाचा क्र.१ येथील केंद्र शासनाच्या मंजूरी आदेशान्वये रू.१८९८७.२४ लक्ष (रू. एकशे एकोनव्वद कोटी सत्याऐंशी लक्ष चोवीस हजार फक्त) इतके अनुदान स्वच्छ भारत मिशन (ग्रा.) च्या केंद्र हिश्श्याच्या पहिल्या हप्त्यापोटी जनजाती क्षेत्र उपयोजना घटकासाठी (अनुसुचित जमाती घटक) राज्यास प्राप्त झालेले आहे.केंद्र पुरस्कृत स्वच्छ भारत मिशनच्या केंद्र हिश्श्यासाठी जनजाती क्षेत्र उपयोजना (अनुसुचित जमाती घटक) घटकाच्या २२१५ ९८६२ या लेखाशीर्षाखाली सन २०१८-१९ मध्ये अर्थसंकल्पीत करण्यात आलेल्या निधीपैकी रू. १८९८७.२४लक्ष एवढा निधी राज्याच्या एकत्रीत निधीत जमा झाल्याचे वित्त विभागाने कळविले आहे. सदर निधी हा मागणी क्र.टी-५ खाली असल्याने, आदिवासी विकास विभागाने वाचा क्रमांक ३ येथील शासन निर्णयान्वये पाणी पुरवठा व स्वच्छता विभागाकडे सुपूर्द केला असून सदर उपलब्ध निधी वितरीत करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता, याबाबत पुढीलप्रमाणे निर्णय घेण्यात आला आहे.

शासन निर्णय

सन २०१८-१९ या आर्थिक वर्षाकरिता केंद्र पुरस्कृत स्वच्छ भारत मिशन (ग्रा.) साठी केंद्र हिश्श्याच्या अनुदानांतर्गत जनजाती क्षेत्र उपयोजना घटकासाठी (अनुसुचित जमाती घटक) स्वच्छता कार्यक्रम

राबविण्यासाठी रु.४७२२५.७१ लक्ष एवढा निधी अर्थसंकल्पीत करण्यात आला आहे. वाचा क्र.१ येथील केंद्र शासनाच्या मंजूरी आदेशान्वये रू.१८९८७.२४ लक्ष (रू. एकशे एकोनव्वद कोटी सत्याऐंशी लक्ष चोवीस हजार फक्त) इतके अनुदान स्वच्छ भारत मिशन (ग्रा.) च्या केंद्र हिश्श्याच्या पहिल्या हप्त्यापोटी जनजाती क्षेत्र उपयोजना घटकासाठी (अनुसुचित जमाती घटक) राज्यास प्राप्त झालेले आहे. वाचा क्र.३ येथील आदिवासी विकास विभागाच्या शासन निर्णयान्वये सदर रू.१८९८७.२४ लक्ष इतका निधी पाणी पुरवठा व स्वच्छता विभागाला खर्चासाठी अर्थसंकल्पीय प्रणालीवर वितरीत करण्यास उपलब्ध करून दिला आहे. सदर निधीपैकी रू. १६३६१.३४ लक्ष (एकशे त्रेसष्ट कोटी, एकसष्ट लक्ष चौतीस हजार फक्त) इतका निधी वासो व संबंधित मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद यांना सोबत जोडलेल्या विवरणपत्रातील स्तंभ क्र. ६ नुसार अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीद्वारे रोख स्वरूपात मुक्त करण्यात येत आहे. सदर अनुदान हे सशर्त मंजूर करण्यात येत आहे.

२. या शासन निर्णयाद्वारे मुक्त केलेली रक्कम पुढील अटींवर मंजूर करण्यात येत आहे.

अ) या शासन निर्णयाद्वारे मंजूर केलेले अनुदान ज्या करणासाठी मंजूर करण्यात आले आहे त्याच करणासाठी खर्च करण्यात यावे. संबंधित जिल्हा परिषदा/संस्था यांनी या शासन निर्णयाद्वारे मुक्त केलेला निधी, या कार्यक्रमासाठी उघडलेल्या स्वतंत्र बँक खात्यात जमा करावा.

आ) संबंधित जिल्हा परिषदेने/संस्थेने या शासन निर्णयाद्वारे मंजूर करण्यात आलेल्या अनुदानापेक्षा जास्त खर्च करू नये.

इ) अट क्र.२-अ आणि २-आ यांची पुर्तता झाली आहे याची खात्री करण्यासाठी, महालेखापाल-१, मुंबई व महालेखापाल-२, नागपूर यांच्याकडे जिल्हा परिषदेच्या संबंधित अधिकारी/कर्मचारी यांनी लेखे तपासणीसाठी सर्व कागदपत्रे उपलब्ध करून द्यावीत.

ई) सदर रक्कम केंद्र शासनाने ठरवून दिलेल्या मार्गदर्शक सूचनांमधील तरतूदींनुसार तसेच या संदर्भात राज्य शासनाने वेळोवेळी निर्गमित केलेल्या सूचनेप्रमाणे/ आदेशाप्रमाणे खर्च करण्यात यावी.

उ) ग्रामीण स्वच्छता कार्यक्रमाचा विहित नमून्यातील मासिक प्रगती अहवाल प्रत्येक महिन्याच्या १० तारखेपर्यंत शासनास पाठविण्याची दक्षता घ्यावी. शासनाने वेळोवेळी निर्गमित केलेल्या सूचनेप्रमाणे जिल्हा परिषदांनी या अनुदानाच्या खर्चाचा महालेखापाल कार्यालयात नोंदविलेल्या खर्चाशी ताळमेळ घालावा व ताळमेळाचे अहवाल विहित कालावधीत या विभागातील पापु-०४, पापु-१६ व पापु-२० या कार्यासनांस सादर करावा.

ऊ) पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था यांनी निधी वितरण, खर्च याबाबतची नोंद केंद्र शासनाच्या संकेतस्थळावर (IMIS) घेण्याची दक्षता घ्यावी.

ऋ) सदर रक्कम खर्च करताना वित्त विभागाचे शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०१८/प्र.क्र.६९/अर्थ-३, दि.०२ एप्रिल,२०१८ मधील अटी व शर्तींचे काटेकोरपणे पालन करून आवश्यक बाबींची पुर्तता करून कार्यपूर्ती अहवाल/नमूद प्रमाणपत्रे शासनास त्वरीत सादर करावीत.

ऌ) आदिवासी विकास विभागाच्या दि.२९ ऑगस्ट,२०१८ च्या शासन निर्णयायातील परिच्छेद क्र.५ अन्वये आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत उपलब्ध करून दिलेली तरतूद फक्त आदिवासी लाभार्थ्यांकरिता व आदिवासी उपयोजना क्षेत्रांतर्गत खर्च करण्यात यावी. तथापि आदिवासी उपयोजना क्षेत्राबाहेर केलेली तरतूद त्या क्षेत्रातील आदिवासी वैयक्तिक लाभार्थ्यांकरिताच खर्च करण्यात यावी.

ऍ) सदर रक्कम खर्च झाल्यानंतर त्याचे उपयोगिता प्रमाणपत्र शासनास त्वरित सादर करावे.

३. हा खर्च "मागणी क्रमांक टी-५, २२१५ पाणी पुरवठा व स्वच्छता, ०२ जलनि:स्सारण व स्वच्छता, ७९६ जनजाती क्षेत्र उपयोजना, (०१) जनजाती क्षेत्र उपयोजनांतर्गत योजना- राज्य योजनांतर्गत योजना, (०१) (०३) स्वच्छ भारत अभियानातंर्गत वैयक्तिक स्वच्छालय बांधणे (२२१५ ९८६२)" ३१ सहायक अनुदाने (वेतनेतर) या लेखाशीर्षाखाली खर्ची घालावा.सदर अनुदान सशर्त मंजूर करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय आदिवासी विकास विभागाचा शासन निर्णय बीयुडी-२०१८/प्र.क्र.०६/ कार्यासन.६, दि.२९ ऑगस्ट, २०१८. अन्वये निधी वितरणाबाबत विभागास प्रदान केलेल्या अधिकारात व वित्त विभागाचे शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०१८/प्र.क्र.६९/अर्थ-३, दि.०२ एप्रिल,२०१८ अन्वये या विभागास प्रदान केलेल्या अधिकारात तसेच सदर परिपत्रकातील अटी व शर्तीच्या अधीन राहून मुक्त करण्यात येत आहे. उपरोक्त रु.१८९८७.२४ लक्ष एवढा केंद्र निधी राज्याच्या एकत्रीत निधीत जमा झाल्याबाबतची खात्री वित्त विभागाच्या अर्थोपाय शाखेकडुन करण्यात आली आहे. वित्त विभागाचे शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०१८/प्र.क्र.६९/अर्थ-३, दि.०२ एप्रिल,२०१८ च्या परिपत्रकातील तसेच परिशिष्टातील अ.क्र.८मधील तपासणीसुचीतील अ.क्र.१ ते १० मधील लागू असलेल्या अटी व शर्तीची पुर्तता होत असल्याचे प्रमाणीत करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८०९२७१५२७४२४४२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Smita Sachin Rane

Digitally signed by Smita Sachin Rane
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Supply and Sanitation Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=f85d92aa99ea42eb86747707e3c3a129af986c1f95f6bc3e8165ceaf5155e6e7, serialNumber=4b9befd340493837db4cffafa6b96eeaf6aa3c12a7a6bf0467b0f517b724e8ee, cn=Smita Sachin Rane
Date: 2018.09.27 17:26:28 +05'30'

( स्मि.स.राणे)

**कार्यासन अधिकारी,महाराष्ट्र शासन**

प्रत,

१. अपर मुख्य सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
२. महालेखापाल, महाराष्ट्र- १/२ मुंबई/नागपूर (लेखा परीक्षा व अनुज्ञेयता)

३. विभागीय आयुक्त, सर्व.
४. उपायुक्त विकास, सर्व विभागीय आयुक्त यांचे कार्यालय.
५. जिल्हाधिकारी व सदस्य सचिव, जिल्हा नियोजन समिती सर्व.
६. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, सर्व.
७. संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई.
८. मुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी लेखा, मुंबई/नागपूर.
९. संचालक, पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था, (WSSO), बेलापूर, नवी मुंबई.
१०. उपमुख्य कार्यकारी अधिकारी (पा.व स्व.), जिल्हा परिषद, सर्व.
११. उप मुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, जिल्हा परिषद, सर्व.
१२. जिल्हा कोषागार अधिकारी, जिल्हा परिषद, सर्व.
१३. मुख्य लेखा व वित्त अधिकारी, जिल्हा परिषद, सर्व.
१४. नियोजन विभाग, (का.क्र.१४४३) मंत्रालय, मुंबई.
१५. आदिवासी विकास विभाग, (कार्यासन-६) मंत्रालय, मुंबई.
१६. वित्त विभाग, (व्यय-३) मंत्रालय, मुंबई.
१७. कार्यासन क्र.पापु-०४, पापु-२०, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई.
१८. निवड नस्ती, कार्यासन पापु-१६.

# विवरणपत्र

**केंद्र पुरस्कृत स्वच्छ भारत मिशन (ग्रा.) अंतर्गत सन २०१८-१९ करिता केंद्र हिश्श्याच्या सर्वसाधारण घटकासाठी अनुदानाचे वितरण (लेखाशिर्ष २२१५ ९८६२).**

(रू.लाखांत)

| अ.क्र. | जिल्हा /संस्थेचे नाव | या शासन निर्णयान्वये मुक्त करण्यात येत असलेला निधी | | | एकूण |
|---|---|---|---|---|---|
| | | वैयक्तिक शौचालयाचे दायित्व | माहिती, शिक्षण आणि संवाद व क्षमता बांधणी | प्रशासकीय बाबी | |
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ |
| १ | वासो | --- | ००.०० | ३८.०४ | ३८.०४ |
| २ | अहमदनगर | २९४.४८ | ३८.६३ | १०.०५ | ३४३.१६ |
| ३ | अकोला | ११९.६८ | ००.०० | १०.०५ | १२९.७३ |
| ४ | अमरावती | ७९५.०९ | ३८.६३ | १०.०५ | ८४३.७७ |
| ५ | औरंगाबाद | २६९.५७ | २४.८३ | १०.०५ | ३०४.४५ |
| ६ | बीड | १०८.२२ | ३०.३५ | १०.०५ | १४८.६२ |
| ७ | भंडारा | ००.०० | १९.३२ | १०.०५ | २९.३७ |
| ८ | बुलढाणा | १३४.५७ | ३५.८७ | १०.०५ | १८०.४९ |
| ९ | चंद्रपूर | ३५.३२ | ४१.४० | १०.०५ | ८६.७७ |
| १० | धुळे | २३०४.८२ | ११.०४ | १०.०५ | २३२५.९१ |
| ११ | गडचिरोली | ११४२.३५ | ३३.११ | १०.०५ | ११८५.५१ |
| १२ | गोंदिया | ००.०० | २२.०८ | १०.०५ | ३२.१३ |
| १३ | हिंगोली | २५२.५८ | १३.८० | १०.०५ | २७६.४३ |
| १४ | जालना | ००.०० | २२.०८ | १०.०५ | ३२.१३ |
| १५ | जळगाव | १०२०.९६ | ४१.४० | १०.०५ | १०७२.४१ |
| १६ | कोल्हापूर | ००.०० | ३३.११ | १०.०५ | ४३.१६ |
| १७ | लातुर | १२.१७ | २७.६० | १०.०५ | ४९.८२ |
| १८ | नागपूर | ००.०० | ३५.८७ | १०.०५ | ४५.९२ |
| १९ | नांदेड | ८१२.३० | ४४.१६ | १०.०५ | ८६६.५१ |
| २० | नंदुरबार | १०९५.९७ | १६.५६ | १०.०५ | ११२२.५८ |
| २१ | नाशिक | ३३२१.१३ | ४१.४० | १०.०५ | ३३७२.५८ |
| २२ | उस्मानाबाद | ११६.४२ | २२.०८ | १०.०५ | १४८.५५ |
| २३ | पालघर | २०००.५० | २२.०८ | १०.०५ | २०३२.६३ |
| २४ | परभणी | २८३.३९ | २४.८४ | १०.०५ | ३१८.२८ |
| २५ | पुणे | ००.०० | ३५.८८ | १०.०५ | ४५.९३ |

| अ.क्र. | जिल्हा /संस्थेचे नाव | या शासन निर्णयान्वये मुक्त करण्यात येत असलेला निधी | | | एकूण |
|---|---|---|---|---|---|
| २६ | रायगड | ५८३.३४ | ४१.४० | १०.०५ | ६३४.७९ |
| २७ | रत्नागिरी | ४१.२६ | २४.८४ | १०.०५ | ७६.१५ |
| २८ | सांगली | ००.०० | २७.६० | १०.०५ | ३७.६५ |
| २९ | सातारा | ७.०६ | ३०.३६ | १०.०५ | ४७.४७ |
| ३० | सिंधुदुर्ग | ००.०० | २२.०८ | १०.०५ | ३२.१३ |
| ३१ | सोलापूर | ४१.४७ | ३०.३६ | १०.०५ | ८१.८८ |
| ३२ | ठाणे | १६६.०१ | १३.८० | १०.०५ | १८९.८६ |
| ३३ | वर्धा | ००.०० | २२.०८ | १०.०५ | ३२.१३ |
| ३४ | वाशिम | ७३.५८ | १६.५६ | १०.०५ | १००.१९ |
| ३५ | यवतमाळ | ००.०० | ४४.१६ | १०.०५ | ५४.२१ |
| एकूण | | १५०३२.२४ | ९४९.३६ | ३७९.७४ | १६३६१.३४ |
| | अक्षरी रूपये | एकशे पन्नास कोटी बत्तीस लाख चोवीस हजार फक्त | नऊ कोटी एकोणपन्नास लक्ष छत्तीस हजार फक्त | तीन कोटी एकोणऐंशी लक्ष चौ-यात्तर हजार फक्त | एकशे त्रेसष्ट कोटी, एकसष्ट लक्ष चोतीस हजार फक्त |

Smita Sachin Rane

Digitally signed by Smita Sachin Rane
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Supply and Sanitation Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=f85d92aa99ea42eb86747707e3c3a129af986c1f95f6bc3e8165ceaf5155e6e7, serialNumber=4b9befd340493837db4cffafa6b96eeaf6aa3c12a7a6bf0467b0f517b724e8ee, cn=Smita Sachin Rane
Date: 2018.09.27 17:27:01 +05'30'

( स्मि.स.राणे)
कार्यासन अधिकारी,महाराष्ट्र शासन